**मराठवाडा विभागासाठी पाणी पुरवठा कृती आराखडा (Water Supply Master Plan-WSMP) तयार करण्यासाठी नेमण्यात आलेल्या मे. मेकोरोट कंपनीच्या कामकाजाचे संनियंत्रण करण्यासाठी कार्यकारी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मवॉग्री-२०१८/प्र.क्र.१५०/पापु-१८**
नववा मजला, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ सप्टेंबर, २०१८

**वाचा:** शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११६/ प्रक्र.१२२/ पापु.०७, दि.६.१२.२०१६

**प्रस्तावना:-**

मराठवाडा विभागातील कायमस्वरूपी पाणी टंचाईवर मात करण्यासाठी ग्रिड पध्दतीने पाणी पुरवठा योजनेची अंमलबजावणी करण्याचे प्रस्तावित आहे. सदर योजनेचा पूर्वअर्हता अहवाल तयार करण्यासाठी संदर्भांकित शासन निर्णयाद्वारे मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याच्या दृष्टीने पाणी पुरवठा कृती आराखडा (Water Supply Master Plan- WSMP) तयार करण्यात येत असून, त्यासाठी मजीप्रा व मे.मेकारोट यांच्या मध्ये शासनाच्या वतीने दि.२१ फेब्रुवारी, २०१८ रोजी सर्वकष करार करण्यात आला आहे. सदर करारानुसार दि.२० फेब्रुवारी, २०२० पर्यंत अंतिम अहवाल अपेक्षित आहे.

प्रस्तावित पाणी पुरवठा कृती आराखड्यासाठी ८ विविध अहवाल मे.मेकोरोट यांचेमार्फत वेळोवेळी सादर करण्यात येणार आहेत. कृती आराखडा तयार करताना पेयजल, औद्योगिक वापरासाठीचे पाणी, तसेच शेतीची गरज इ. सर्व प्रकारच्या मागण्या व उपलब्धता विचारात घेण्यात येणार असून या सर्व बाबींचा अहवालात समावेश करण्यात येणार आहे. मे.मेकोरोट कंपनी यांना अहवाल तयार करण्यासाठी माहिती उपलब्ध करणे आहे, वेळोवेळी त्यांचे सोबत चर्चा करणे, कंपनीने सादर केलेल्या अहवालावर अभिप्राय देणे, कंपनीकडून प्राप्त अहवाल मान्य करणेसाठी शासनास सादर करणे इ. बाबतीत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कृषी विभाग, जलसंपदा विभाग इ. विभागांचा सहभाग असणे आवश्यक आहे. तदनुषंगाने मराठवाडा ग्रिड संबंधी मे. मेकोरोट कंपनीमार्फत करण्यात येत असलेल्या कामकाजाचे संनियंत्रण करण्यासाठी कार्यकारी समिती गठीत करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:**

मराठवाडा ग्रिड संबंधी मे. मेकोरोट कंपनीमार्फत करण्यात येत असलेल्या कामकाजाचे संनियंत्रण करण्यासाठी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | अध्यक्ष |
| २. | आयुक्त, कृषी, महाराष्ट्र शासन,पुणे | सदस्य |
| ३. | संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे | सदस्य |
| ४. | कार्यकारी संचालक, गोदावरी विकास पाटबंधारे महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| ५. | मुख्य अभियंता, मजीप्रा, औरंगाबाद | सदस्य |
| ६. | उप सचिव तथा अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग | सदस्य |
| ७. | सहसंचालक, कृषी, औरंगाबाद | सदस्य |
| ८. | सहसंचालक, कृषी, लातूर | सदस्य |
| ९. | विभागीय अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| १०. | कार्यकारी अभियंता, मजीप्रा विभाग, जालना | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीद्वारे मे.मेकोरोट कंपनी यांना पाणी पुरवठा कृती आराखड्यासाठी विविध अहवाल तयार करण्यासाठी (Water Supply Master Plan- WSMP) माहिती उपलब्ध करून देणे, वेळोवेळी त्यांचे सोबत चर्चा करणे, कंपनीने सादर केलेल्या अहवालावर अभिप्राय देणे, कंपनीकडून प्राप्त अहवाल मान्य करणेसाठी शासनास सादर करणे इ.बाबी अपेक्षित आहे.

सदर समितीच्या बैठकांचे आयोजन इत्यादी तसेच समितीचा अंतिम अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी (तांत्रिक) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांची राहील. या प्रकरणी होणा-या प्रत्यक्ष खर्चाची प्रतिपूर्ती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून तयाचा संकेताक २०१८०९२६१५१९५६८२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sham Lal Goyal

Digitally signed by Sham Lal Goyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Watersupply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fef8a156550c1999143688f755340a6b9d3ad380fcde16709e4e63210467e734, serialNumber=19d0cb2b5b2018974e0c848afbd781451d1c4c0d347d2a12395c8dffac4670f9, cn=Sham Lal Goyal
Date: 2018.10.04 13:10:32 +05'30'

**( शामलाल गोयल )**

अप्पर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सर्व मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०.विभागीय अयुक्त (सर्व)
११. संचालक (तांत्रिक) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१२. संचालक, गोदावरी खोरे.
१३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
१५. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१९. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२०. अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२१. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद (सर्व)
२२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व नियंत्रण अधिकारी व सर्व कार्यासने.
२३. शासकीय आय.आय.टी.संस्था, पवई, मुंबई.
२४. सर्व शासकीय अभियांत्रिकी (पदवी/पदविका) महाविद्यालये
२५. निवडनस्ती, कार्यासन पापु-१८).